शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना अत्युत्कृष्ट कामाबद्दल आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक:आवेवा-१०९२/प्र.क्र. ५९/९२/आठ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ५ नोव्हेंबर १९९२.

संदर्भ:- १] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एसआरव्ही-१०६९/डी, दिनांक २६ जून, १९७०.

२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एसआरव्ही-१०७२/डी, दिनांक ११ फेब्रुवारी, १९७४.

३] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एसआरव्ही-१०८१/१४३३/प्र.क्र. ११९/आठ, दिनांक २४ डिसेंबर, १९८१.

४] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एसआरव्ही-१०८९/२८२९/प्र.क्र. ४०६/आठ, दिनांक ४ एप्रिल, १९९०.

५] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:आवेवा-१०८९/४४/प्र.क्र. १२/आठ, दिनांक २ जून, १९९०.

६] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:आवेवा-१०९०/प्र.क्र. १५२/आठ, दिनांक २९ ऑक्टोबर, १९९०.

शासन निर्णय :

कर्मचा-यास/अधिका-यास पाच वर्षात एकापेक्षा जास्तवेळा आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्यात येवू नयेत, असे आदेश उपरोक्त दिनांक २६ जून, १९७० च्या परिपत्रकान्वये देण्यात आले आहेत. तसेच आगाऊ वेतनवाढ मंजूर करण्याच्या दिनांकात एकवाक्यता राखली जावी म्हणून ज्यांना आगाऊ वेतनवाढ मिळण्यासाठी दिनांक १ ऑक्टोबर हा दिनांक निश्चित करण्यात आलेला आहे. अशा परिस्थितीत उपरोक्त पांच वर्षाची गणना कशा प्रकारे करण्यात यावी, असा प्रश्न कांही विभागांनी उपस्थित केला होता. त्याबाबत सम्यक विचार करता पुढीलप्रमाणे स्पष्टीकरण करण्यात येत आहे:-

अ] उपरोक्त पांच वर्षाची गणना गोपनीय अभिलेख वर्षाप्रमाणे करण्यात यावी. उदा. दिनांक १ ऑक्टोबर, १९८५ रोजी आगाऊ वेतनवाढ मंजूर केलेल्या अधिकारी/कर्मचा-यांचे सन ८५-८६, ८६-८७, ८७-८८, ८८-८९ आणि सन ८९-९० या पुढील पांच वर्षांचे गोपनीय अभिलेख उपलब्ध झाल्यावर असा अधिकारी/कर्मचारी पुन: आगाऊ वेतनवाढीसाठी विचारार्थ पात्र समजण्यात यावा.

...२/-

ब] ज्या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना आगाऊ वेतनवाढी देण्याचा प्रस्ताव विचाराधीन असेल त्यांची संख्या जर संवर्गनिहाय विहित कमाल ५ टक्के प्रमाणकापेक्षा जास्त असेल व जर त्यावेळी त्या कर्मचा-याच्या/अधिका-याच्या गोपनीय अभिलेख्यांची/अहवालाची प्रतवारी सारखीच असेल तर अशावेळी कशाप्रकारे कार्यवाही व्हावी, त्याबाबतचे स्पष्टीकरण उपरोक्त दिनांक २९ ऑक्टोबर १९९० च्या आदेशांतील परिच्छेद क्र. १ [३] मध्ये करण्यात आले आहे. त्याबाबत आता पुढीलप्रमाणे सुधारीत आदेश देण्यात येत आहेत:-

ज्या शासकीय कर्मचा-यांना/अधिका-यांना आगाऊ वेतनवाढी देण्याचा प्रस्ताव विचाराधीन असेल त्यांची संख्या जर संवर्गनिहाय विहित कमाल ५ टक्के या प्रमाणकापेक्षा जास्त असेल व जर त्यावेळी विचारार्थ सेवकाची गोपनीय अभिलेख्यांची प्रतवारी सारखीच असेल तर पुर्वीत अलीकडे ज्या सेवकांना आगाऊ वेतनवाढीचा फायदा मिळालेला नाही, त्यांचा ज्येष्ठतेनुसार आगाऊ वेतनवाढी देण्याकरिता विचार करण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ य. मा. जोशी ],
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०० ०३५,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई [१० जादा प्रतींसह],
* सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा व हकदारी], मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा परीक्षा], मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ [लेखा व हकदारी], नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ [लेखा परीक्षा], नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक [निवासी लेखे], कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन ८,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निरनिराळ्या मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख
व कार्यालय प्रमुख,

* पत्राने.

३२२९२